भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील सहाय्यक भूवैज्ञानिक श्रीम. एच. ए. जोशी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

### शासन निर्णय क्रमांकः आपना-०२२१/प्र.क्र. २२२/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
तारीख: २८ जानेवारी, २०२२

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः परिवि-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६.
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः आपना-४५५१/प्र.क्र. ३६८/पापु-१५, दिनांक ३१ मे, २०१२.
३) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्रमांकः प्रशासन/आस्था १/ श्रीमती जोशी/सभूवै/वै.पं.१/४००/२०२१ दि. ३१.०८.२०२१.
४) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्र. प्रशासन/आस्था-१/श्रीमती जोशी/सभूवै/वै.प.१/५९५/२०२१ दि. २३.१२.२०२१.

**प्रस्तावना :-**

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील सहाय्यक भूवैज्ञानिक या पदावर संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये दोन वर्षाच्या परीविक्षा कालावधीकरीता श्रीम. एच. ए. जोशी यांची नियुक्ती करण्यात आली आहे. ही नियुक्ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार "सहाय्यक भूवैज्ञानिक" या पदावर शासन सेवेत प्रथम नियुक्ती करण्यात आली आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारीत मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून श्रीम. एच. ए. जोशी यांनी सहाय्यक भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे या पदावर त्यांचा २ वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने व तशी शिफारश संचालनालयाने संदर्भाधीन क्रमांक ३ येथील पत्रान्वये केलेली असल्याने श्रीम. एच. ए. जोशी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करून त्यांना नियमित "सहाय्यक भूवैज्ञानिक" म्हणून नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील सहाय्यक भूवैज्ञानिक यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या असल्याने स्तंभ क्रमांक ५ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यास व त्यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | परिविक्षाधीन सहसंचालकाचे नाव | सहाय्यक भूवैज्ञानिक पदावर रुजू झाल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधीत घेतलेल्या रजा | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | सहाय्यक भूवैज्ञानिक पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्रीम. एच. ए. जोशी | १८.०६.२०१२ | ५५३ | २२.१२.२०१५ | २३.१२.२०१५ |

आयुक्त , भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना कळविण्यात येते की, उक्त सहाय्यक भूवैज्ञानिक यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने उचित कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवि-२७१५/प्र.क्र. ३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ मधील तरतूदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवी-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१२८१४५९२५७८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, serialNumber=1325a2533f628572438b5fb711c805de49788678b97015bb0cac990e3b375423, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2022.01.31 11:58:39 +05'30'

**(गणेश पवार)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.
३.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५.महालेखापाल, लेखापरीक्षा-१, महाराष्ट्र, मुंबई.
६.महालेखापाल, लेखापरीक्षा-२, महाराष्ट्र, नागपूर.
७.श्रीम. एच. ए. जोशी, सहाय्यक भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (संचालनालयामार्फत)
८.निवडनस्ती (कार्यासन, पापु-१५)